जलसंपदा विभागाच्या नियंत्रणाखालील पाच सिंचन विकास महामंडळांतर्गत अधिकारी/ कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अंनियो-२०१५/प्र.क्र.५०३/आ(क्षेप्र)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०३ डिसेंबर, २०१६.

वाचा :

१) शासन पत्र क्रमांक: बीजीएम १००९/६०/२००९/अर्थ-१, दि.०६.०६.२०१२.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००७/१८/सेवा-४, दि.०७.०७.२००७.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.०६.०४.२०१५

**शासन परिपत्रक:**

जलसंपदा विभागांतर्गत पाच महामंडळात कार्यरत असलेले अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा राज्य शासनाकडून सदर महामंडळांकडे दैनंदिन कामकाजासाठी वर्ग केलेल्या आहेत. सदरचे अधिकारी/कर्मचारी हे राज्यशासकीय अधिकारी/कर्मचारी आहेत. दि.०१.११.२००५ नंतर शासन सेवेत नियुक्त होणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) शासन निर्णय वित्त विभाग दि.३१.१०.२००५ अन्वये लागू करण्यात आली आहे. सदर योजना या विभागांतर्गत कार्यरत असलेल्या महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यानांही लागू आहे. त्यामुळे सदर योजना लागू असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना महामंडळाकडुन होणाऱ्या वेतनातून त्यांची अंशदाने उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदीनुसार महामंडळांनी संबंधित कोषागारांकडे पाठविणे आवश्यक आहे. याबाबतच्या सूचना शासन पत्र क्रमांक: बीजीएम १००९/६०/२००९/अर्थ-१, दि.०६.०६.२०१२ अन्वये देण्यात आल्या आहेत. प्रशासकीय कारणास्तव, तसेच कार्यप्रकारात व अन्य कारणांमुळे होणाऱ्या बदलांमुळे, विभागाच्या अखत्यारीतील क्षेत्रीय स्तरावरील पाच महामंडळातंर्गत प्रदेश/मंडळ/विभाग/उपविभाग/ शाखा यामध्ये वर्ग होणारे अधिकारी/कर्मचारी यांचे परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे (DCPS) खाते, हे अधिकारी/कर्मचारी ज्या संबंधित कार्यालयांमध्ये सेवा वर्ग होतील त्या प्रदेश/मंडळ/विभाग/उपविभाग/शाखा यांनी अद्ययावत ठेवण्याची कार्यवाही करणे आवश्यक राहील. तसेच याबाबतची जबाबदारी संबंधित कार्यालयांचीही राहिल. ही कार्यपद्धती अवलंबिताना शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००७/१८/सेवा-४, दि.०७.०७.२००७ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

२. दि.०१.११.२००५ नंतर शासन सेवेत रुजू होणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा, राज्य शासनाकडील कार्यालयांनी म्हणजेच नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी महामंडळाकडे वर्ग करताना त्यांचा सेवार्थ क्रमांक, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना क्रमांक (DCPS), राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजने (NPS) मधील नोंदणीबाबत कार्यवाही करुन या सर्व तपशीलासह अंशदानाची कपात करुन सदर रकमा संबंधित कोषागारात जमा करण्याबाबतचे आदेश निर्गमित करावेत. त्याची प्रत संबंधित कोषागारासही दयावी. सदरची योजना दि.०१.११.२००५ पासून सुरु झाल्याने व प्रत्यक्ष अंमलबजावणी दि.०७.०७.२००७ पासून सुरु झाल्याने या कालावधीत कोषागारात भरणा केलेल्या रकमांचा ताळमेळ संबंधित कार्यालयांनी पूर्ण करावा. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.०६.०४.२०१५ मधील तरतूदीनुसार दि.०१.०४.२०१५ नंतर

शासकीय लेख्यात रकमा जमा केल्या असतील तर सदरची अंशदाने थेट राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत (NPS) वर्ग करण्याबाबत कार्यवाही करावी.

३. या परिपत्रकातील सूचना पाच सिंचन विकास महामंडळात दि.०१.११.२००५ नंतर रुजू झालेल्या राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना लागू असतील.

४. हे परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- १२७/१६/सेवा-४, दि.२२.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१६१२०३१५३६५१०४२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubhangi Ajit Gosavi

Digitally signed by Shubhangi Ajit Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shubhangi Ajit Gosavi
Date: 2016.12.03 15:38:25 +05'30'

**( शुभांगी गोसावी )**
शासनाच्या अवर सचिव

**प्रत,**

१. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. सहसंचालक, सुधारणा, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
५. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी,(सर्व महामंडळा अंतर्गत)
६. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
७. सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. निवडनस्ती.